सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजनेअंतर्गत मा. लोकप्रतिनिधींनी सुचविलेल्या कामांच्या मंजूरी व निधी वितरणाबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

## शासन शुध्दीपत्रक क्र. दवसू-२०१८/प्र.क्र.३२५/अजाक

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : २४ डिसेंबर, २०१८

<u>संदर्भ :</u> १. शासन निर्णय क्र. दवसू-२०१५/प्र.क्र. ३४७/अजाक दि. ०९.०३.२०१८

२. क्र. दवसू-२०१५/प्र.क्र. २३२ /अजाक दि. १२.११.२०१८

**शासन शुध्दीपत्रक:-**

नागरी व ग्रामीण क्षेत्रातील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या वस्ती/गावांचा विकास करण्यासाठी या घटकांना मुलभूत सुविधा पुरविण्यासाठी मा. लोकप्रतिनिधींनी सुचविलेल्या कामांना शासन स्तरावरुन मान्यता देऊन या योजनेअंतर्गत घ्यावयाची कामे, अंमलबजावणी यंत्रणा व इतर निकष निश्चित करण्यासाठी “भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजना” सन २०१८-१९ पासून राबविण्याचा निर्णय शासनाने संदर्भीय शासन निर्णयान्वये घेतला आहे. संदर्भिय क्र.२ च्या शासन निर्णयानुसार मा. लोकप्रतिनिधीनी (आमदार/खासदार) सुचविलेल्या नागरी व ग्रामीण भागातील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या वस्त्यामधील कामांना तत्वतः मान्यता देण्यात आली असून परिशिष्ट “ब” येथे नमूद हिंगोली जिल्ह्याकरीता नमूद करण्यात आलेल्या कामाच्या यादीतील खालील तक्यात नमूद अनुक्रमांक ६, ११ व १३ येथील कामांचा समावेश करण्यात आला आहे.

| यादीतील अ.क्र. | कामाचे नाव | अंदाजित किंमत तत्वत: मान्यता (रु.लक्ष) | सन २०१८-१९ करीता वितरीत तरतुद (रु.लक्ष) |
|---|---|---|---|
| ६ | कडोली, ता. सेनगांव (मातंग समाजासाठी) येथे समाजमंदिर बांधकाम करणे | १०.०० | ४.०० |
| ११ | खंडाळा, ता.हिंगोली येथे अनु.जाती वस्तीमध्ये समाजमंदिर बांधकाम करणे | ५.०० | २.०० |
| १३ | फाळेगांव, ता. हिंगोली येथे अनु.जाती वस्तीमध्ये समाजमंदिर बांधकाम करणे | ५.०० | २.०० |

उपरोक्त नमूद कामांऐवजी खालील कामांचा नव्याने समावेश करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | अंदाजित किंमत तत्वत: मान्यता (रु.लक्ष) | सन २०१८-१९ करीता वितरीत तरतुद (रु.लक्ष) |
|---|---|---|---|
| ६ | कडोळी ता.सेनगांव या ठिकाणी सिमेंट रस्ता बांधकाम करणे | १०.०० | ४.०० |
| ११ | खंडाळा ता.हिंगोली समाजमंदीरास वॉल कंपाउंड करणे | ५.०० | २.०० |
| १३ | फाळेगांव ता. हिंगोली कंपाउंड वॉल बांधकाम | ५.०० | २.०० |

उपरोक्त कामे अनुसूचित जाती व नवबौध्द वस्तीतीलच आहेत याची उपायुक्त (समाज कल्याण), लातूर यांनी खात्री करावी, या अटीवर उपरोक्त मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८१२२४१७०२०७२३२२ असा आहे. हे शासन शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dinesh Ramchandra Dingle

Digitally signed by Dinesh Ramchandra Dingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd836467a8648a8d21dc84bc01be, cn=Dinesh Ramchandra Dingle
Date: 2018.12.24 17:06:14 +05'30'

**( दिनेश रा. डिंगळे )**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,महाराष्ट्र राज्य
२. मा.मुख्यमंत्री,महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
३. मा.मंत्री (सा.न्या.व वि.स.)यांचे खाजगी सचिव
४. मा.मंत्री (महसुल) यांचे खाजगी सचिव
५. मा.मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव
६. मा.मंत्री (आदिवासी) यांचे खजगी सचिव
७. मा.मंत्री (अल्पसंख्याक) यांचे खजगी सचिव
८. मा.राज्य मंत्री (सा.न्या.व वि.स.) यांचे खाजगी सचिव
९. मा.मुख्यसचिव, महाराष्ट्र राज्य
१०.मा. प्रधान सचिव (महसुल)
११.सचिव, सा.न्या. व वि.स.विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
१२.आयुक्त, समाजकल्याण, पुणे
१३.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता)
१४.सर्व जिल्हाधिकारी
१५.सर्व प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण
१६.सर्व सहाय्यक आयुक्त,समाजकल्याण
१७.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१८.निवडनस्ती (अजाक).